

# ।। कामकलाविलास: ।।

## संस्कृत-मराठी

सौ मानसी वैद्य ,ठाणे

### भूमिका

परब्रहम हि मूळस्थिति आहे जी तुर्याअवस्थेच्या वर आहे,ज्यास निष्कला (कला नसलेली) असे सुध्दा म्हणतात ज्याचे ध्यान करता येत नाही तर एकात्मपणेच हयास जाणता येते कारण हे आत्मस्वरूप आहे,म्हणून हे नाम,मन,बुध्दीच्या पलीकडे आहे,स्वरूप हे स्वरूपानेच जाणता येते अर्थात स्वस्वरूप व्हावे लागते.म्हणून हया स्वरूपास तत-सत असे संबोधावे लागते,ब्रहम हे निष्कल (कला-प्रकृतीरहित) व सकल (सर्वकला-पूर्णप्रकृती असलेले) दोन्ही आहे.अर्थात सगुण-निर्गुण स्वरूप ब्रहम आहे.
प्रकृती हीच शक्ती आहे जी नित्य-अखंड आनंदस्वरूप आहे.सगुणरुपात ब्रहम व शक्ती शब्द-नाद स्वरूपात आहे.हि शक्तीच सर्व सृष्टीचे कारण आहे म्हणून हिला शारदा असे म्हणतात, बि-मधून जसे तेल निघावे तशी हया ब्रहम-प्रकृती बीजातून सृष्टी उत्पन्न होते.एकोऽहं बहुस्याम हया इच्छेने हि सगुण-सृष्टी उत्पन्न होते व हेच नामरूपात्मक आहे ज्याची उपासना,ध्यान केले जाते.

शिवशक्ति हया परानादापासून पराबिदू (बिंदू - एक अवस्था) होतो जे सगुणरूप शब्दब्रहम आहे तो गोलाने दर्शवितात हया गोलाच्या मध्यात ब्रहमपद आहे जेथे प्रकृती-पुरुष आहे,गोलाचा परीघ हा माया दर्शवितो,हा पराबिंदू निर्वाकलेच्या (अर्धचन्द्राने दर्शवितात),जी सतरावी कला समजली जाते तिच्या टोकाला आहे,हे सर्व अमाकाला जि एका गोलाने चंद्रमंडल दर्शवितात त्यात आहे,अमाकला हि सोळावी कला आहे.सर्व मंत्रांचे मूळ हि अमाकला आहे,एक हजार पाकळ्या असलेले (सहस्त्रदल कमळ) आहे ज्याच्या परीघावर गुरुचक्र आहे व हंसा: चा विसर्ग आहे त्याच्या वर सूर्य मंडल आहे अमाकालाचे चन्द्रमंडल हे हयावर अर्थात सूर्यमंडलावर आहे,पराबिंदुच्या(बिंदू - एक अवस्था) बाजूला निबोधिका अग्नी आहे,पराबिंदू व निबोधिका अग्नी आणि निर्वाणकला हे तिन्ही कामकला हयात आहेत,कमाकला उलट्या (टोक खाली) त्रिकोणाने दाखवितात,हे सगुण शब्दब्रहम आहे हया कमाकला त्रिकोणास अ-क-थ त्रिकोण असे सुध्दा म्हणतात कारण हया त्रिकोणाच्या टोकावर प्रत्येकी अ-क-थ अशी अक्षरे आहेत, त्रिकोणाच्या आत ह,ल,क्ष अक्षरे आहेत,प्रत्येक बाजूस १६ अक्षरे आहेत जि एका बाजूला अ पासून क पर्यन्त दुसऱ्या बाजूला क पासून पुढची संस्कृत बाराखडीचि १६ अक्षरे व तिसऱ्या बाजूस क ते थ अशी अक्षरे आहेत अश्या रितीने संस्कृत मधील सर्व बाराखडी आहे,हया शक्तीच्या मातृका होत.अर्थात देवी मातृकामयी आहे. अ-क-थ त्रिकोणाभोवती ((काल्पनिक त्रिकोण)त्रिकोणाप्रमाणे रचना असलेल्या)) चन्द्रमंडल आहे,

ज्याप्रमाणे दाण्याचे दोन भाग एका आवरणात असतात तसा पराबिंदु असतो,असे प्रकृती-पुरुष एका पराबिंदूत असतात.हयास शिव-शक्ति किंवा शब्दब्रहम असे सुध्दा म्हणतात.शिव व शक्तितत्व (जेव्हा शक्ती उन्मुख होऊन शिवांकडे वळते तेव्हा ) प्रकट होते तेव्हा मायेचे आवरण (पराबिंदूच्या बाहेरचे) फुटून निर्मिती होते,तेव्हा हि प्रक्रिया हं-स: (शिव-शक्ती)(ह च्या अर्ध्याभागात कला आहेत) अशी निर्देशित करतात.हया प्रक्रियेच्या वेळेस (निर्मिती) एक अव्यक्त नाद होतो जो पहिला नाद आहे तसेच समाधी कडे जातांना शेवटचा नाद आहे.हया निर्मिती प्रक्रियेत विंदू-वज-नाद असे

तीन भाग आहेत,विंदू हा नादमय शिवाचा भाग असे समजले जाते,वज- शक्तीचा भाग आहे व नाद हा दोन्हीच्या मधील दुवा आहे,नाद जो शिवांकडचा आहे त्यात त्रिगुण आहेत,जेव्हा नाद तमोगुणात्मक असतो तेव्हा ध्वनीरूप असतो.त्यातील अव्यक्त भाग ह्यास निबोधिका (अग्नी) किंवा बोधिका असे म्हणतात,रजोगुणमय नाद हा वर्णमालात्मक आहे,सत्वगुण हा विंदू आहे,तम व रज हे एकदुसऱ्यास मारक आहेत,म्हणून कार्य हे सत्वगुण असल्यानंतरच होते,नाद,विंदू,निबोधिका हे सूर्य,चन्द्र व अग्नी दर्शवितात.ज्ञान हे अग्निरूप (तमोगुण) आहे कारण अग्नी सर्व अज्ञान भस्म करून शुध्द ज्ञान देतो म्हणून ह्याचे योगमार्गात महत्व आहे.चंद्रात सोळा कला व अमृत आहे ज्याचा क्षय (ते अक्षय आहे) होत नाही ह्यासच "***अमाकला*** "असे म्हणतात.इच्छा हे कार्य चंद्राचे आहे जे निर्मितीसाठी आवश्यक आहे,क्रिया हे सूर्याचे कार्य समजतात कारण सर्व दृश्य त्यामुळेच होते.शब्दब्रह्मात अशातर्हेने ज्ञान-इच्छा-कार्य अश्या तीन शक्ति आहेत ज्या त्रिगुणात्मक आहेत.अशारितीने पराबिंदु विन्धात्मक व कालात्मक आहे.

शब्दब्रह्मातुन असे ब्रह्मा-विष्णु-रूद्र उत्पन्न होतात ज्यांच्या रौद्री (ज्ञान),वामा (क्रिया),जेष्ठा (इच्छा) ह्या शक्ती आहेत.अर्थात अग्नी-वाहिनी-ज्ञान,सूर्य-क्रिया,चन्द्र-इच्छा होय.ह्यास त्रिपुर असे म्हणतात व शक्तीस त्रिपुरसुंदरी म्हणतात.

अमृतसागरात स्वर्गातील अनेक कल्पवृक्ष आहेत तेथील कदंब वृक्षांच्या दाटीत चिंतामणी आहे तेथे परमशिवस्थान आहे त्याठिकाणी शिव-शक्ती मिलन स्थान असल्याचे समजले जाते.शिवाची अनेक नावे आहेत जि निर्मितीच्या टप्प्यावर असलेल्या त्यांच्या कार्यानुसार आहेत जसे प्रथम परमशिव नंतर शंभु (हे काळाशी संबंधित आहे) नंतर सदाशिव जेथून निर्मितीची सुरवात होते नंतर ईश्वर-ईश नंतर रुद्र (रुद्र त्रिगुणातील ह्यात विष्णु व ब्रह्मा सुद्धा आहेत) येथे शिव-ब्रह्मा-विष्णु आपल्या शक्तीबरोबर आहेत.अश्यारतीने शिवाची १००८ नावे आहेत.

शक्ती मायारूप आहे (कारण ब्रह्म ज्यातून आहे त्यापेक्षा वेगळेपणाने प्रकट होते,) तसेच ति मूळप्रकृती (अव्यक्त) आहे.निर्मिती नंतर ति नामरूप होते.अव्यक्तात त्रिगुणांची साम्यावस्था असते,त्रिगुण (महाकारण स्वरूप) स्वभाव दाखविते ज्यात चैतन्यापासून जड व जडापासून चैतन्य असा प्रवास होतो,देवी म्हणूनच गुणात्मक आहे असे म्हणतात,ह्या मूळप्रकृतीच्या गर्भात ब्रह्माचे बीज आहे ज्याने हि सृष्टी निर्माण होते.त्रिगुणांची साम्यावस्था गर्भात जेव्हा नसते तेव्हा रजोगुणाच्या प्रभावाने व शिवस्वरूपाच्या प्रकाशाने (चित्त) हि सृष्टी निर्माण होते ज्यात महेश्र्वर-महेश्र्वरी ह्याचे नियंत्रण आहे,शिव-शक्ती हे व्दिरूप मूलाधार चक्रात स्वयंभूलिंग व त्यास साडेतीन-वेटोळे घातलेली कुंडलिनी अश्या स्वरूपात आहे,वेटोळे घातल्याने हिला कुंडलिनी म्हणतात,हि जीवशक्ति आहे जि प्राण ह्या स्वरूपाने समजते.कान बंद करून हऽऽ असा आवाज हा त्या शक्तीचा आहे हा आवाज बंद होणे व ऐकु न येणे हाच देहाचा जीवशक्तिने केलेला त्याग अर्थात मृत्यु समीप आहे.

अव्यक्तातुन महत होते ज्यात त्रिगुण प्रकर्शाने असतात,त्यातून गुणात्मक अहंकार अर्थात तमोगुणात्मक अहंकार,रजोगुणात्मक अहंकार सत्वगुणात्मक अहंकार,तामसिक अहंकार हा सूक्ष्म मातृकांचा उगम आहे ह्या मातृका पंचमहाभुतांच्या आहेत,ज्यात आकाश-पारदर्शक,वायु - निळा,श्यामवर्ण,अग्नी - लाल,पाणी - पांढरे,पृथ्वी - पिवळे आहे जे शब्द,स्पर्श,दृष्टी,चव,वास दर्शविते.त्यानंतर वैखरिका,तेजस,भूतादिक आहेत अर्थात अव्यक्त - महत -मातृका - वैखरिका - तेजस - भूतादिक क्रम,शक्तीसच देवी अर्थात माया असे म्हणतात सर्व संसाराच्या उत्पत्तीच्या स्वामित्वामुळे तिला महामाया असे सुध्दा म्हणतात.हि अविद्या व विद्या दोन्ही आहे कारण बन्धन व मुक्ती हि मायेमुळेच आहे.हीच वाचकशक्ती आहे,अर्थात प्रकृतीत चित्त मायेमुळेच आहे किंवा चित्तच ती आहे.हीच अव्यक्त दशेत ब्रह्म आहे,निर्माण व पालन ह्या कार्याने ति माता आहे,तिच्या परब्रह्म स्वरूपात आकार व गुणांच्या पलीकडची आहे,साकार स्वरुपात प्रथम

परा (अव्यक्त) नंतर सूक्ष्म स्वरूपात मंत्ररूप जेहि आकाररहित आहे व तिसरे स्थुलरूप जे साकार स्वरूप आहे.शक्तीची अनेक स्त्री-रूपे प्रसिध्द आहेतच.शरीरात कुंडलिनी स्वरूप आहे.शक्तिची अशी अनंत सर्वव्याप्त रूपे आहेत.

**बिन्दुत्रिकोणवसुकोणदशारयुग्ममन्वश्रनागदलसंयुतषोडशारम् ।**
**वृत्तत्रयं च धरणीसदनत्रयं च श्रीचक्रमेतदुदितं परदेवतायाः ॥**



---

श्रीविद्या चक्र

**आतून बाहेर - १) लालबिंदू (सर्वआनंदमय २) पांढरा उलटा त्रिकोण - सर्वसिध्दीप्रद ३) लाल आठ त्रिकोण - सर्व-रोगहार ४) निळे दहा त्रिकोण - सर्व-रक्षकर ५) लाल दहा त्रिकोण - सर्वार्थ-साधक ६) निळे चौदा त्रिकोण - सर्व- सौभाग्यदायक ७)लाल आठ पाकळ्यांचे कमळ - सर्व-संक्षोभन ८) निळे सोळा पाकळ्यांचे कमळ - सर्वस्व - परीपुरक ९)पिवळे परीघावर - त्रैलोक्य-मोहन**

सकलभुवनदयस्थिती लयमयलीलाविनोदनोद्युक्त: ।

अन्तर्लीनविमर्श: पातु महेशमात्रतनु: ।।१।।

सकल – सर्वतत्व,भुवन - पंचीकरणाचे पाचही भाव,दयस्थिती - शिवापासून सुरवात व शेवट (तत्वांचा ब्रह्मस्वरूपापासून उत्पत्ती व लय आहे. ज्यास अनुराग व निरोध असे म्हणतात), लयमयलीला - सृष्टी उत्पती व लय हि परमेश्र्वराची लीला आहे. कारण ह्यास प्रयोजन नाही ज्यात स्वतः निर्मिती व स्वतःतच लय करतो, उद्युक्त - निर्मिती करण्याची त्याची इच्छा अन्तर्लीन - सर्वव्याप्त स्वतः असल्याने अंतर्मुखपणा अर्थात बाहयविषयांची संगत नसलेला विमर्श: - जगाची उत्पत्ती स्थिती लय स्वयं असल्याचा अनुभव अर्थात अविनाशी असणे तोच विमर्श आहे जो अंतर्मुख आहे, महेशमात्रतनु: -

महेशासारखा(सतत निर्मिती व लय करणारा) जो नियंता आहे,ज्याच्या प्रकाशानेच हे जग आहे असा अंतर्प्रकाश,ज्याच्यात,सर्वव्याप्त सर्वशक्ती,सर्वजाणपण,सर्वकार्य,पूर्णत्व सामावले आहे.

अंतर्बाह्य व्याप्त स्वयंप्रकाश अश्या परमेश्वराने ज्याचीच उत्पत्ती-स्थिती-लय असलेली सृष्टी म्हणजे लीला आहे,त्याने आमचे रक्षण करावे.

सा जयति शक्तिराज्ञा निजसुखमयनित्यनिरूपमाकारा ।

भाविचराचरबीजं शिवरूपविमर्शनिर्मलादर्श: ।।२।।

सा जयति शक्तिराज्ञा - आदिशक्ती (त्रिपुरसुंदरी) हि सर्वात-वरती आहे,जिच्यात सर्व ३६ तत्वे आहेत,ज्याची सुरवात शिव व अंत क्षीती आहे,जी तीनही बिंदूच्यावर (सूर्य,चंद्र.अग्नी) आहे, निजसुखमयनित्यनिरूपमाकारा - तिचे नैसर्गिक स्वरूपच अंतर्मुख व अखंड-नित्य,अतिशय आनंदमयी आहे,अर्थात आत्मानंदस्वरूप आहे भाविचराचरबीजं - चराचराचे बीज(असलेल्या व पुढे होणाऱ्या सर्वांचे तीच आहे) शिवरूपविमर्शनिर्मलादर्श: - शिवांची शक्ती तीच अर्थात त्याचे प्रतिबिंब शक्ती आहे,शिव तिच्याच स्वरूपाने प्रकट आहेत.

तीच आदिशक्ती आहे,जी सर्वात वरची आहे,तिचे स्वरूप हे अथांग नित्य-अखंड आनंद आहे,जी सर्व चराचराचे बीज व कारण आहे,ती शिवांचे प्रतिबिंब आहे,ह्या शक्तीमुळेच शिवांना स्व-त्वाचा अनुभव येतो.

स्फुटशिवशक्तिसमागम बीजाङ्कुररुपिणी पराशक्ति: ।।

अणुतररूपानुत्तर विमर्शलिपिलक्ष्यविग्रहा: भाति ।।३।।

स्फुटशिवशक्तिसमागम बीजाङ्कुररुपिणी पराशक्ति:- शिवशक्ती मिलनाचे बीज व त्याची व्यक्त दशा हिच आहे अर्थात हिच (पराशक्ती - त्रिपुरसुंदरी) शिवतत्वांपासून सर्व तत्वे निर्मिती व त्याचा क्षितीतत्वात लय घडवून आणते,हि निर्मितीच्या आधीची आहे जी आनंद,ज्ञान,कार्य,इच्छा सर्व आहे म्हणून हिला सर्वात उत्तम (परा) असे म्हंटले आहे.येथे शिव-ज्ञानशक्ती व शक्ती हि क्रियाशक्ती आहे. अणुतररूपानुत्तर - सूक्ष्माहून सूक्ष्म व मोठ्याहून मोठी असे तिचे रूप आहे, विमर्श - स्वरूप,लक्ष्य - स्वरूप दिसते,लिपी - हिच्या आधी (अर्थात अ अक्षरा आधी) व नंतर (अर्थात ह अक्षरानंतर) नाही (अकार व हकार) अर्थात सर्व वर्णमाला अहं च्या मध्ये आहेत,अ व ह ह्याच्या मिलनाने हिचे स्वरूप समजते.म्हणून वर्ण,पद,मात्रा,कला,तत्व,भावना ह्याची हि माता-जननी आहे.

ती सौदर्याची खाण आहे,शिवशक्ती मिलनाचे बीज व विस्तार तीच आहे,तिचे स्वरूप अतिशय सूक्ष्म आहे,तिचे स्वरूप प्रथम अक्षर अ व शेवटचे अक्षर ह ह्याच्या मिलनाने निर्मिले जाते अर्थात अहं(अनुभव-विमर्श व अनुभवघेणारा-विमर्षक (ब्रह्म) एकच आहे)

परशिवरविकरेनिकरे प्रतिफलति विमर्शदर्पणे विशदे ।।

प्रतिरुचिरुचिरे कुड्ये चित्तमये निविशते महाबिंदु: ।।४।।

परशिव - शिवस्वरूप प्रकाश,विकरेनिकरे - अनंतनिर्मल-शुध्दकिरण, प्रतिफलति - ज्यात परावर्तीत होतात, विमर्श - शक्ती,हालचाल,गती,दर्पणे - आरसा (शिव स्वरूप शक्तीत आरशासारखे प्रकाशमान होते म्हणून हिला स्फुरता असे म्हणतात) प्रतिरुचिरुचिरे - त्याशक्तीत कुड्ये - (भिंत) चित्त निविशते - जेव्हा स्व-स्वरूप आरशात पाहावे असे घडते तेव्हा चित्तावर महाबिंदू उत्पन्न होतो.

जेव्हा प्रकाशरूप शिवाचे अनंत किरण शक्तीरूप आरशावर पडतात तेव्हा चित्तावर पडणाऱ्या त्याप्रकाशाने महाबिंदू उत्पन्न होतो.

चित्तमयोऽहंकार: सुव्यक्ताहार्णसमरसाकार: ।।

शिवशक्तिमिथुनपिंण्ड: कवलीकृतभुवनमण्डलो जयति ।।५।।

चित्तमयोऽहंकार: - शिवस्वरूपाचे शक्तीतील प्रतीबिंब हे अहंकाराचे कारण अर्थात अनुभव आहे,हा अहंकाराचा अनुभव सर्वात वर आहे जे आत्मस्मरण देते म्हणून अहं हा अनुभव हीच आत्मविश्रांती आहे. सुव्यक्ताहार्णसमरसाकार: व्यक्त होणारी अ व ह हि अक्षरे एका पासून दुसरे व दुसऱ्या पासून पहिले आहे कारण ती पहिली व शेवटची अक्षरे आहेत समरस - एक दुसऱ्याच्या (अ व ह) मिलनात अहंकाराने हि अक्षरे प्रत्येकी अर्धा (सारखा) भाग मिळून तयार होण्याचा प्रयत्न करतात.
शिवशक्तिमिथुनपिंण्ड:- शिव-प्रकाश व शक्ती(विमर्श) - हालचाल,प्रतिबिंब ह्याचे एकत्रीकरण हाच अहंकार आहे,म्हणून ह्याचे सारखे भाग अहंकाराने होण्याचा प्रयत्न करतात कवलीकृत - म्हणून ह्या अहंकारात भुवनमण्डलो - भुवने व मंडले-अनेक ब्रह्मांडे अर्थात (सर्व ३६ तत्वे व सर्व(वर्णमाला)अक्षरे आहेत) शब्द व त्याचा अर्थ निर्माण होतो (जे अवर्ण आहे-ज्यात सर्व अर्थ आहे त्यातून शक्तीच्या मिलनाने अनेक वर्ण (शब्द) तयार होतात.)

शिवशक्तीचे मिलनामुळे निर्माण झालेला अहंकार (मी चा अनुभव) हा सर्वात (मुख्य)वर आहे,तसेच अ व ह ह्या पहिल्या व शेवटच्या अक्षराच्या पूर्ण एकत्रीकरणाने (अहं) सर्व ब्रह्मांड त्यात सामावले आहे जे चित्त आहे.

सितशोणबिन्दुयुगुलं विविक्तशिवशक्तिसंकुचत्पसरम् ।।

वागर्थसृष्टिहेतुः परस्पराप्रविष्टविस्पष्टम् ।।६।।

सित – पांढरा (शिव) ,शोण – लाल (शक्ती) शिवशक्तीच्या गुप्त लिलेतून विविक्तशिवशक्तिसंकुचत्पसरम्- विविक्तपणे ह्या बिंदूच्या आकुंचन व प्रसरण अर्थात लय व निर्मिती ह्या नियमाने जसे फुलाच्या पाकळ्या बंद होतात व उघडतात त्याप्रमाणे वागर्थसृष्टिहेतुः - वाग -चार वाणी (परा,पश्यंती,मध्यमा,वैखरी) अर्थ - ३६ तत्वे ज्याची शिवांपासून सुरवात व क्षती येथे अंत आहे सृष्टिहेतुः - सृष्टीनिर्मितीच्या हेतूने जी सहा अध्व आहे असे समजले जाते सध्व (अध्व-मार्ग,मात्राध्व - ज्ञान,अध्व सहा आहेत शब्दांकडून तीन - वर्ण,पद,मंत्र जे एकमेकांवर अवलंबून आहेत दुसऱ्याबाजूने तीन - कला (५),तत्वे (३६),भुवने (२२४)) परस्पराप्रविष्टविस्पष्टम् - लाल व पांढरा बिंदू एकमेकात मिसळतात व वेगळे होतात.

बिन्दुरहंकारात्मा रविरेतन्मिथुनसमरसाकार: ।।

काम: कमनीयतया कला च दहनेन्दुविग्रहौ बिन्दु ।।७।।

बिन्दुरहंकारात्मा - तीनही बिंदू (लाल,पांढरा,मिश्र) रविरेतन्मिथुनसमरसाकार: - ह्यातील सूर्यबिंदू हा लाल व पांढऱ्या बिंदूचे मैथुन स्वरूप आहे अर्थात शिव-प्रकाश,काम व विमर्श-शक्ती,कामेश्र्वरी अर्थात कला ह्यांच्या (दहनेन्दुविग्रहौ) परस्पर सहकार्याचे स्वरूप हा सूर्यबिंदू-मिश्रबिंदू (इकार) आहे.

दोन बिंदू लाल व पांढरा हे शिव-शक्ती आहेत,हे त्यांच्या गुप्त मिलनात आकुंचन व प्रसरण पावतात,हेच शब्द (वक) व अर्थ ह्याच्या निर्मितीस कारण आहेत,एक दुसऱ्यात बिंदूंचे मिसळणे व वेगळे होणे हेच आकुंचन व प्रसरण आहे,अहंकारात्मक बिंदू हा सूर्यस्वरूप आहे,तोच ***काम*** आहे,त्याच्या स्वरूपामुळे त्यास असे समजले जाते,चन्द्र व अग्नी (विमर्शशक्तीचे स्वरूप) ह्या ***कला*** आहेत. (जसे अमावास्येला सूर्य चंद्र एकमेकात मिसळतात व सकाळी सूर्य (चंद्र व अग्नीतून) बाहेर येतो व सायंकाळी सूर्य अग्नीत शिरतो,ह्यासाठी सूर्य हा मिश्रबिंदू आहे असे समजले जाते)

परमेश्र्वर जो अक्षर अ ने दर्शवितात जो सर्व वेद व ज्ञान आहे तो बिंदूरूप (बिंदूभाव) होतो व स्वभूत अश्या विमर्श शक्तीत शिरतो त्या शक्तीत सर्व सृष्टी लय पावते,त्यानंतर विमर्शशक्ती प्रकाशमय बिंदूत शिरते जो तिच्यातच आहे,तेव्हा हा मिश्रबिंदू कार्यासाठी सिध्द होतो,त्या मिश्रबिंदुतून नादात्मक शक्ती निर्माण होते जी सर्व तत्वांची जननी आहे हि तेजोमय असून बीजरूप आहे तसेच केसाच्या टोकासारखी सूक्ष्म आहे जी श्रृंगातक स्वरूप घेते (जणू तत्वरूप श्रृंगार केला आहे)

अ व ह हि अक्षरे प्रकाश व विमर्श (शिव - शक्ती) स्वरूप दर्शवितात अकार व हकार ह्यातील कार हे वर्ण दर्शविते ह्यादोन्ही अक्षरांच्या मिलनाने मिश्रबिंदू निर्माण होतो

जेव्हा पांढराबिंदू लाल तत्वात शिरतो तेव्हा परेत (परा-शक्तीत) शंभू अश्या लालतत्वास परातत्व असे म्हणतात,जेव्हा हे लालतत्व पांढऱ्या शक्तीत असते तेव्हा पराशंभू व सच्चीदानंद स्वरूप म्हणतात,(ह्या तीन बिंदुंच्या स्वरूपास) ह्यास **कामकला किंवा कमाकाल** असे सुध्दा म्हणतात.योगीजन ह्या सच्चीदानंद स्वरूपाचे ध्यान करतात.कारण येथे अक्षय आनंद व प्रकाश आहे तसेच पूर्णरूपाचा आत्मरूपाचा अनुभव आहे,हेच शून्य-महाशुन्य आहे अर्थात काही नसणे.

इति कामकलाविद्या देवीचक्रक्रमात्मिका सेयम् ।।

विदिता येन स मुक्तो भवति महात्रिपुरसुन्दरीरूप: ।।८।।

इति - वरच सांगितलेले, कामकलाविद्या - त्रिपुरसुंदरीचे ज्ञान देवीचक्रक्रमात्मिका - त्रिपुरसुंदरी यंत्र,मंत्र,देवता ह्या संबंधीचे सर्व ज्ञान सेयम् - प्राप्त होते. विदिता - गुरुच्याकडून ज्ञान मिळवून

अश्या तर्हेने गुरु कडून ह्याचे ज्ञान प्राप्त करून ज्ञान व ध्यानाने साधक मुक्त होतो कारण त्याच्यावर महात्रिपुरसुंदरीची कृपा होते.कारण येथे स्वरुपाची स्वरूपाशी ओळख होते.

स्फुरितादरुणाद्विन्दोर्नादब्रह्माङ्कुरारवो व्यक्त: ।।

तस्माग्दगनसमीरण दहनोदकभूमिवर्णसंभूति: ।।९।।

स्फुरितादरुणा - लालबिंदू जेव्हा निर्मितीस तयार होतो तेव्हा (जेव्हा त्याच्या गर्भातून निर्मितीची वेळ येते), र्नादब्रह्माङ्कुरारवो - सर्व नादांचा मूळ नाद अर्थात अनाहत जो कधीही न नाहीसा होणारा

लालबिंदुपासून नादाचा अंकुर अर्थात अनाहत होतो (बिंदूवरील एक आवरण हे नाद आहे),हेच शब्दब्रह्म आहे,ह्यापासूनच पंचमहाभूते व अक्षरे (अर्थात अ-क्षर नाश न होणारे सुध्दा होते) निर्माण होतात,बिंदूच्या विभाजनाने आकाश होते व नाद होतो ह्यातील अ अक्षर हे निशब्द ब्रह्मस्वरूप आहे अर्थात हे परमात्मास्वरूप आहे.

अथविशदादपि बिन्दोर्गगनानिल-वन्हि-वारि-भूमिजनि: ।।

एतत्पञ्चकविकृति जगदिदमण्वाद्यजाण्डपर्यन्तम् ।।१०।।

अश्या तर्हेनेच पांढऱ्या बिंदूपासून सुध्दा सूक्ष्मापासून ब्रह्मांडापर्यंत निर्मिती होते ह्यात पंचमहाभूते होतात,हिच विकृत्ती आहे,कारण पांढरा बिंदू हा प्रकाश आहे ज्यात सर्व जग (जाण्डपर्यन्तम् – जडापर्यंत) उत्पन्न होते व नाहीसे होते,पांढरा व लाल बिंदू अश्यारितीने जो प्रकाश व विमर्श आहे तो सर्व जगाची उत्पत्ती व लय ह्याचे स्थान आहे.कारण हे दोन्ही बिंदू एकत्रच आहेत,

बिन्दुव्दितयं यव्ददभेदविहीनं परस्परं तव्दत् ।।

विद्ध्यादेवतयोरपि न भेदलेशोऽस्ति वेद्यवेदकयो: ।।११।।

बिन्दुव्दितयं – दोन बिंदू ,परस्परं - परस्परात

दोन्ही बिंदू वेगळे करता येत नाहीत (अभेद्य) आहेत,अर्थात शिव-शक्ती तत्व एकरूप आहे जसे विद्ध्या-निर्देश (वेदक-वाचक) व देवता-निर्देशकेलेले (वेद्य - वाच्य) ह्यात फरक करता येत नाही, विद्ध्या हा पंधरा अक्षरी मंत्र आहे व देवता हि महात्रिपुरसुंदरी आहे.सर्व मंत्रांचा आधार शक्ति आहे,जी मातुकारूप आहे तसेच शिवात्मक आहे,मातृकेत शक्ती व परमात्म्याचा प्रकाश आहे.ज्याची सुरवात ब्रह्म व शेवट भुवने आहे

वागर्थैनित्ययुक्तौ परस्परं शक्तिशिवमयावेतौ ।।

सृष्टिस्थितिलयभेदौ त्रिधा विभक्तौ त्रिबीजरूपेण ।।१२।।

जसा शब्द (वाक) व शब्दार्थ (अर्थ) एकच आहे,तसे शिव-शक्ती आहेत,निर्मिती-स्थिति-लय ह्यात त्रिबीज स्वरूप आहे.त्यांचे भिन्नत्व हे स्व-प्रेरणेने आहे.वाक वर्ण,पद,मंत्रात्मक आहेत,अर्थ हा कला,तत्व व भुवने आहे.ह्यास सहा अध्व असे सुध्दा म्हणतात.हे सहा अध्व प्रकाश-विमर्श ह्याचे स्वरूप आहे.त्यांच्या एकत्रपणामुळेच सृष्टी निर्मिती दिसते.निर्मिती तत्वे शिवस्वरूपापासून व लय क्षतीत आहे हे सर्व स्वात्मसाकार स्वरूप आहे व शब्द व अर्थ हे शिव-शक्ती स्वरूप आहे.

ज्याप्रमाणे अग्नी व त्याचा ज्वलनशीलपणा आहे तसेच शिव-शक्तीचे नित्य तादात्म्य आहे ह्यात तत्वांतर नाही.प्रकाश-विमर्श तीन प्रकारांनी (विभक्त) आहे.जे त्रिबीज-त्रयात्मक आहे, हि तीन बीजे वागभाव,वागेश्र्वरी - ज्ञानशक्ती आहे,जी मुक्तीचे साधन आहे,कामराज,कामबीज- कमाकाल आहे,जी क्रियाशक्ती आहे,अर्थात जी वरदायिनी आहे, शक्तीबीज,पराशक्ती- इच्छाशक्ती होय.

माता मानंमेयं बिन्दुत्रयं भिन्नबीजरूपाणि ।।

धामत्रय-पीठत्रय शक्तित्रयभेदभावितान्यपि च ।।१३।।

तेषु क्रमेण लिग्ङ त्र्ययं तव्दच्च मातृकात्रितयम् ।।

इत्थं त्रितयपुरिया तुरीयपीठा च भेदिनी विद्ध्या ।।१४।।

ज्ञाता (ईश्वर) ज्ञान (भूतविद्या) व ज्ञेय (माया) हे तीन बिंदू व हि बीजाची तीन स्वरूपे आहेत,तीन प्रकाश,तीन पीठे व तीन शक्ती ज्याने हे तीन बिंदू जाणता येतात,ह्यात सुध्दा तीन लिंगे(परा,बाण,इत्र) व तीन मातृकांचा (अ-क-थ) क्रम आहे,विद्यादेवीचे शरीर अश्या तर्हेने तीन पदरी आहे ,चवथे पीठ ज्यास तुर्यापीठ असे म्हणतात,तीन बिंदू हे लाल,पांढरा,मिश्र होत,बीज हे निर्वाण बीज (महाबिंदू) होय,हे तिन्हीचे आहे,

परमज्योती जे चित्त व आनंदस्वरूप आहे तसेच जे घनात्मास्वरूप आहे ज्यात मीपणाचा भाव आहे त्यात ज्ञाता,ज्ञान,ज्ञेय ह्या तिन्हीचा अनुभव आहे,निर्मितीच्या सुरवातीस जो आदिपुरुष होता तेव्हा काही नव्हते तेव्हाचा हा अहं भाव आहे.म्हणूनच हा चित्ताचा आनंदमयी घनभाव असे समजले जाते.निर्मितीच्या वेळेस संपूर्ण प्रकाश होता तोच आत्मा आहे,तो सृष्टीच्या निर्मितीत ज्ञाता,ज्ञेय,ज्ञान असा विभागला गेला,म्हणून ह्यास त्रिपुर व भेदस्थान असे म्हणतात.

शब्द-स्पर्शौ रूपं रस-गन्धौ चेति भूतसुक्ष्माणि ।।

व्यापकमाद्यं व्याप्यं तूत्तरमेव क्रमेण पञ्चदश ।।१५।।

पञ्चदशाक्षररूपा नित्या चैषा हि भौतिकाभिमता ।।

नित्या: शब्दादिगुण प्रभेदभिन्नास्तथानया व्याप्ता: ।।१६।।

नित्यास्तिथ्याकारा स्तिथयश्च शिवशक्तिसमरसाकारा: ।।

दिवसनिशामय्यस्ता: श्रीवर्णास्तेऽपि तव्दयीरूपा: ।।१७।।

आवाज-आकाश,स्पर्श-वायू,आकार-तेजस,चव-आप,वास-पृथ्वी हि सूक्ष्म भुते आहेत,सर्व भुते व्यापक आहेत ज्याने १५ गुण निर्माण होतात,त्रिपुरसुंदरीचा मंत्र पंधरा शब्दांचा आहे,तो तिचे स्वरूप दाखवितो,ज्यात १५ चंद्रकला असून मंत्रात (प्रकाश व विमर्श (दिवस-रात्र)) शिव-शक्ती दर्शविणारे दुहेरी शब्द आहेत,म्हणून ह्यास चिदविलास असे सुध्दा म्हणतात मंत्र जो नित्य आहे त्याचे स्वरूप कूटस्थ,स्थिर,न बदलणारे आहे.समुद्रातील लाटांप्रमाणे गुण निर्माण होतात व नाहीसे होतात.चंद्राच्या कलाप्रमाणे गुण कमी-जास्त होतात व सोळावी कला आहे जी विमर्श-शक्ती आहे (म्हणून षोडशकला प्रसिध्द आहेत.)

स्वरव्यंजन-बिन्दुत्रय समंष्टिभेदैर्विभाविताकारा ।।

षग्दिशत्तत्वात्मा तत्वातीता च केवला विद्या ।।१८।।

विद्या तीन बिन्दूनी बनली आहे,स्वर व व्यंजने एकत्रपणे व वेगळेपणाने ह्यात ३६ तत्वे आहेत जी प्रत्यक्ष देवी (शक्तीच) आहे.जीच सर्व ब्रह्मांडात आहे. अर्थात तेच विद्यास्वरूप आहे.स्वर अ पासून व व्यंजने क पासून आहेत.देवीचे शरीर जे ह्या तीन बिन्दुनी बनले आहे त्यात अनुस्वार व विसर्ग आहे.३६ तत्वांची सुरवात शिवांपासून व शेवट क्षिती आहे,सर्व तत्वांचे केवळ तीच (स्वव्यक्त) मूळ आहे. ह्यात वाग्भव - पाच व्यंजने व सात स्वर ,कामबीज - सहा व्यंजने व आठ स्वर,शक्ती - चार व्यंजने व सहा स्वर आहेत,३६ तत्वे जी तिचे हात आहेत अशी विद्या सर्वात श्रेष्ठ आहे असे प्रसिध्द आहे.

विद्यापि तादृगात्मा सूक्ष्मा सा त्रिपुरसुन्दरी देवी ।।

विद्यावेद्यात्मकयो रत्यन्ताभेदमामनन्त्यार्या: ।।१९।।

योगीजन विद्या व वेद्य एकच आहे हे जाणतात.तिचे स्वरूप चित्त व आनंद आहे,जी ब्रह्मांडात सर्व तत्वरूप आहे व त्यापुढे हि ती जाणारी आहे.तिचे स्वरूप सूक्ष्म अर्थात भेदरहित आहे,तिच्या स्पुट-प्रेरणारुपी सौदर्य व तीनअस्वस्थेतील निर्मिती स्वरूपामुळे योगीजन तिला त्रिपुरसुंदरी म्हणतात. शिवांपासून हि अभेद्य आहे,(ज्ञानबल) म्हणून हिला शिवांची विद्या अर्थात सरस्वती असे म्हणतात.जणु एक शिव व बहु शक्तीच आहे.

या सान्तरोहरूपा परा महेशी त्रिभाविता सैव ।।

स्पष्टा पश्यन्त्यादि त्रिमातृकात्मा चक्रतां याता ।।२०।।

तिचे अंर्तस्वरूप परास्वरूप आहे जे मनाच्या (अंतःकरण) पलीकडे आहे म्हणून तिला महेशी असे सुध्दा म्हणतात,म्हणून वेदसुध्दा तिचे वर्णन शब्दांनी करू शकत नाहीत,ज्या स्वरूपाच्या दर्शनाने सर्व कर्मे नाहीशी होतात,तीच पश्यंती व तीन मातृका स्वरूपात व कुंडलिनी चक्रांत स्थित आहे.परा-वक जे स्वस्वरूपच आहे ते अक्षय आहे पराच- मध्यमा,पश्यंती,वैखरी स्वरूपात आहे.

चक्रस्यापि महेश्या न भेदलेशोऽपि भाव्यते विबुधै: ।।

अनयो: सूक्ष्माकारा परैव स्थूलयोश्च न कापि भिदा ।।२१।।

शक्तीचे चक्र हे नऊ मंडलाचे आहे,ज्यात प्रत्येकी तीन मंडले मध्यमा वैखरी,पश्यंती वाणीची आहेत,मंडले त्रैलोक्य स्वरूपापासून निघून बिंदूत संपतात,बिंदु हेच पराआकाश आहे,ज्ञानी लोक चक्र व देवतेत फरक मानत नाहीत,कारण हिच नऊ भागात आहे,पाच शक्ति व चार अग्नी मिळून हि नउ चक्रे

निर्माण झाली.म्हणून बिंदुस ***कामकला*** असे म्हणतात.कामकला त्रिकोणाने दर्शवितात अर्थात सुरवात त्रिकोणाने व शेवट चोकोनाने अर्थात पृथ्वी आहे.

मध्यं चक्रस्य स्यात् परमयं बिन्दुतत्वमेवेदम् ।।

उच्छूनं तच्च यदा त्रिकोणरूपेण परिणतं स्पष्टम् ।।२२।।

एतत्पश्यन्त्यादि त्रितयनिदानं त्रिबीजरूपं च ।।

वामा जेष्ठा रौद्री चाम्बिका चानुत्तरांशभूता:स्यु: ।।२३।।

इच्छा-ज्ञान-क्रिया शान्ताश्र्चैतास्तथोत्तरावयवा: ।।

व्यस्ताव्यस्तं तदर्ण व्दयमिदमेकादशात्म पश्यन्ती ।।२४।।

बिंदु (परामाया)जेव्हा निर्मितीच्या पायरीजवळ (उच्युक्त) असतो तेव्हा बिंदुत सर्ववाणी एकत्र असते,निर्मितीच्या वेळी हाच बिंदु त्रिकोणात्मक होतो जिच कमाकाला आहे,हा त्रिकोण पश्यंती,वैखरी व मध्यमा शक्तीचे स्थान आहे,अर्थात तीन बीजे होत (वाग्भव,कामराज,शक्ती),हा त्रिकोण श्रीघटासारखा दिसतो,अंतर्नाद व इच्छा ह्याचेच फळरूप हा त्रिकोण आहे हा परमप्रकाश रूप आहे पण ह्याचे तेज मात्रा,मन,मेय व प्रमाद ह्यांनी कमी झाले आहे.श्रीचक्राच्या वामा,जेष्ठा,रुद्री,अंबिका व पराशक्ती हि एक बाजू व दुसरी बाजू इच्छा,ज्ञान,क्रिया,शांता आहेत असे नऊ भाग तसेच अ व ह अक्षर एकत्र व वेगवेगळे असे मिळून एकूण अकरा बाजू आहेत.अशी नऊ व अकरा भागाची पश्यंती आहे.तिलाच इच्छा शक्ती म्हणतात,ज्ञानशक्ती हि जेष्ठा,रजोरेखा वाक (इच्छा) हि मध्यमा आहे,क्रियाशक्ती ह्याच पराशक्तीचे स्वरूप रौद्री आहे,लय होताना सर्व मूळबिंदुरुपात सामावले जाते.इच्छा,क्रिया व वाक ह्या त्रिकोणाच्या तीन बाजू आहेत त्यास अ-क-थ त्रिकोण असे सुध्दा म्हणतात.ज्याची वाग्भव,कामराज व शक्ती अशी तीन बीजे आहेत.

श्रीचक्रातील वर टोक असलेले पांच त्रिकोण पराशक्तीचे वामा,जेष्ठा,रुद्री,अंबिका,च (च हे अक्षर) आहेत,वर खाली टोक असलेले चार त्रिकोण हे इच्छा,ज्ञान,क्रिया,शांत हे पराशक्तीचे निर्मितीतील नऊ त्रिकोणस्वरूप दर्शवितात.प्रथम स्फुरण व शेवट वैखरी वाणी आहे.

अ आणि ह ह्या कामकलात सर्व इतर वर्णे मध्ये आहेत.जणु अहं हा भावच आहे,अर्थात पराशक्तीचे व्यापकरूप सर्व सृष्टी आहे.अर्थात पूर्णस्वरूप आहे.जे सर्वतत्वांचे स्वामित्व दर्शविते.

एवं कामकलात्मा त्रिबिन्दुतत्वस्वरूपवर्णमयी ।।

सेयं त्रिकोणरूपं याता त्रिगुणस्वरूपिणी माता ।।२५।।

काम-कला मिळून तीन अक्षरे आहेत ज्याचे स्वरूप बिंदू आहे हे शक्तिरूप त्रिगुणस्वरूप आहे,जे त्रिकोण स्वरूप आहे,(हेच काम -शिव-प्रकाश-अ अक्षर आणि कला-शक्ती-विमर्श-हअक्षर ह्याचे स्वरूप आहे) हाच मी (अहं) भाव आहे,कामकलेचे तीन बिंदू हे लाल-पांढरा-मिश्र हे आहेत,हाच मूळ (पुराणस्वरूप) प्रणव आहे,ह्याचे ज्ञान त्रिकोण स्वरुपात होते,पांढराबिंदू हा आधाररहित आहे,लालबिंदू शक्तीरूप आहे,त्याचे मिलन हि निर्वाण अवस्था आहे,ह्या प्रणवातील (हंऽसा:) सा - हि शक्तीरूप असून तो चित्तातील परमानंद आहे,ज्यामुळे हा परमानंद निर्देशित केला जातो तोच आत्मा आहे (आत्मसाक्षित्व),असे समाधी अवस्थेपर्यंत (ब्रह्मांडाशी) तादात्म पावलेल्या योगांचे म्हणणे आहे,शक्तीच इच्छा,ज्ञान,क्रिया ह्यास्वरुपात त्रिगुणात (सत्व,रज,तम) ह्या गुणांनी प्रकट होते,म्हणूनच सर्वात प्रथम आत्मस्वरूप होते असे म्हंटले जाते.हा त्रिकोण सर्वसिध्दी प्रदान करणारा आहे.

एका परा तदन्या वामादिव्यष्टिमात्रसृष्ट्यात्मा ।।

तेन नवात्मा जाता माता सा मध्यमाभिधानाभ्याम् ।।२६।।

व्दिविधा मध्यमा सा सूक्ष्म-स्थूलाकृति: स्थिता सूक्ष्मा ।।

नवनादयमी स्थूला नववर्णात्मा च भूतलिप्याख्या ।।२७।।

26-27

परावाणीच्या पुढे पश्यंती आहे जी निर्माण शक्ती आहे(सृष्ट्यात्मक) आहे,हिच पश्यंती वामा ते शांत ह्या शक्तींची जननी आहे,अंबिका हि त्यातील स्पुरण शक्ती आहे म्हणून हि परावाक आहे (महासत्ता होण्याचे स्फुरण-निर्मितीचे स्फुरण),रुद्री लयात्मिका आहे व वामा निर्माण शक्ती (वमन- सृष्टी ओकल्यासारखा भास आहे),मध्यमा वाणी स्थूल व सूक्ष्म आहे,सूक्ष्मरूप नित्य आहे व स्थूलरूप नवनादात्मक आहे ज्याने तिला भूताप्ली असे म्हणतात.शांता हि संवेदना अर्थात चिन्मय शक्ती आहे जी सर्वव्याप्त आहे (म्हणून हिला निरंकुश-सर्वव्याप्त,निष्कला-उच्चआनंद,निष्क्रिय-कार्यहिन असे सुध्दा म्हणतात)

जेव्हा कुंडलिनी मुलाधारातून सहस्त्राकडे जाते तेव्हा अंर्तमुख झालेले योगी गुरुचक्रात नाद ऐकतात जो शिवभक्तांना आत्मनाद आहे असेच जाणवते सर्व अंर्तउच्चार हे मध्यमेने होतात,मूलाधाराकडून तिचे नउ नाद हे चीन,चीनचीन,घंटा,शंख,तंबोरा,झांज,बासुरी,भेरी,मृदंग,मेघनाद असे नाद येतात,हंऽसा: (प्रणव) हा जसा लाकडात अग्नी आहे तसा सर्व शरीरात आहे,ह्यासाठी योग्याने मुलाधारापासून वरवर ब्रह्मरंध्रापर्यंत ध्यान करत जावे,ते करताना स्वतः ॐकार स्वरूप असल्याचे कल्पावे ब्रह्मरंध्राजवळ हंऽसाचे नादात रुपांतर (लय) होईल.नाद हा शुध्द स्वरूप परमात्माच आहे,जेव्हा हंऽसाचे नादात रुपांतर

(लय) होईल त्यानंतर श्वासरहित,मनरहित,तुर्येतीत अवस्था प्राप्त होईल,अश्या मनरहित अवस्थेत, संकल्प - विकल्प नाहीसे होतात,तेव्हा शक्तीस्वरूप शिव जे प्रकाशमय,शुध्द,नित्य,सर्वत्र,निरंजन,शांत असे स्वरूप दिसेल.

निराकार परमसूक्ष्म शक्ती मूलाधारात स्थित आहे,जेव्हा मुलाधारातून अग्नीच्या प्रभावाने उठून ती मुक्त होते व वर जाते तेव्हा पूर्णवैराग्य प्राप्त झालेले योगी मुलाधारातून शक्ती वर जाताना काळसूक्ष्म अश्या कुंडलिनीच्या शिवपिंडीवरील प्रथम फेऱ्यात बिंदू नादात्मक होतो त्यानंतर सरळ होणाऱ्या फेऱ्यात रजोगुण असलेल्या जेष्ठा शक्तीचा अनुभव येतो,येथे कुंडलिनी वैखरीने बिंदूनादात्मक होते,येथे तिला लाखिनी असे म्हणतात,त्यानंतर तिसऱ्या पायरीवर रौद्री किंवा रोधिका (रोधिका - मुक्तीचा मार्ग थांबवलेली) असे म्हणतात,अर्धचंद्र (अर्धवेटोळे) येथे अंबिका स्वरूप आहे

आद्या कारणमन्या कार्य त्वनयोर्यतस्ततो हेतो: ।।

सैवेयं नहि भेद स्तादात्म्यं हेतुहेतुमदभीष्टम् ।।२८।।

मध्यमा सूक्ष्मरुपात करण व स्थूलरुपात कार्य आहे,खरे तर ह्यात काहीच फरक नाही,जसे कारण (हेतू) व प्रभाव (हेतुत्व-कार्य) ह्यात फरक नाही एका अवस्थेतून (सूक्ष्म) हि दुसऱ्याची (स्थुलाची) सुरवात आहे,दोन्ही अवस्थांचे तादात्म्य आहे.(ह्यात फरक नाही-आहेनाही) समजण्यासाठी हे नाव आहे.

श-ष-स-पवर्गमयं तव्दसुकोणं मध्यकोणंविस्तार: ।।

नवकोणं मध्यंचे त्यस्मिंश्चिद्दीपदीपिके दशके ।।२९।।

तच्छायाव्दितयमिदं दशारचक्रव्दयात्मना विततम् ।।

त-ट-च-कवर्गचतुष्टय-विलसनविस्पष्टकोणविस्तारम् ।।३०।।

श्रीघटातील नऊ त्रिकोण श,स,ष व प वर्गात (प ची बाराखडी) त्याचा विस्तार आहे,नऊ त्रिकोण (मधील त्रिकोण व बाजूस आठ) व बिंदू मिळून दशक होते,ह्यात चित्ताचा प्रकाश (चित्तदिप) आहे,दहा चक्रांच्या दोन छाया (कांती-प्रभा) आहेत आतला त्रिकोण त,ट वर्ग आहे,बाहेरचा त्रिकोण च,क वर्ग आहेत.बिंदू हे शक्तीचे स्थान आहे जी तेजोमयी आहे,ह्यास अग्नीचे शेवटचे स्थान (प्रलयाग्नी) कालाग्नीरुद्र व चित्तकला ह्याचे मिलनस्थान असे सुध्दा म्हणतात.

एतच्चचतुष्कप्रभया समुपेतं दशारपरिणामं ।।

आदिस्वरचतुर्दश वर्णमयाश्रं चतुर्दशारमभूत ।।३१।।

परया पश्यन्त्यापि च मध्यमया स्थूलवर्णरुपिण्या ।।

आभिरेकोनपत्र्चा शदक्षरात्मा वैखरी जाता ।।३२।।

बाह्य चक्रावर (दहा-त्रिकोणांवर) आतील चार चक्रांचा (बिंदू,त्रिकोण,आठत्रिकोण व आतील (छाया दशत्रिकोण) त्रिकोणांचा प्रकाश बाहेरील (दशत्रिकोण) (जवळ असल्याने) पडतो,ह्या चौदा चक्रांना **सर्वशुभदायक** असे सुध्दा म्हणतात ह्यात अक्षरे अ पासून सुरु होतात.परा-पश्यंती-मध्यमेतून ५१ (संस्कृत शब्दमाला) वैखरी तयार होते.मध्यमेत सूक्ष्म स्वरुपात नऊ नाद आहेत,स्थुलात नऊवर्ग आहेत मध्यमेत अक्षरांचा उच्चार होत नाही,मध्यमा वैखरीच्या आधीची पायरी आहे.

कादिभिरष्टाभिरुपचित मष्टदलाब्जं च वैखरीवर्गै ।।

स्वरगणसमुदितमेतद व्द्यष्टदलाम्भोरुहं च संचिन्त्यम् ।।३३।।

बिन्दूत्रयमयतेज स्त्रितयविकारं च तानि वृत्तानि ।।

भूबिम्बत्रयमेतत् पश्यन्त्यादित्रिमातृविश्रान्ति ।।३४।।

ह्या चौदा त्रिकोण असलेल्या चक्राच्या भोवती आठ पाकळ्यांचे (सर्वसमक्षोभन - सर्वहलणारे) व सोळा पाकळ्यांचे (सर्वपरिपुरक - सर्व कामना पूर्ण करणारे) कमळ आहे,ह्या सोळा पाकळ्यांच्या चक्रावर वैखरी शक्तीची सोळा व्यंजने क पासून पुढील क वर्गातील आहेत,

ह्याच्या (चौदा त्रिकोण असलेल्या चक्राच्या भोवती आठ पाकळ्यांचे (सर्वसमशोभन - सर्वहलणारे) व सोळा पाकळ्यांचे (सर्वपरिपुरक - सर्व कामना पूर्ण करणारे) कमळ आहे) बाहेर एक त्रिकोण रूप आहे ज्यावर पश्यंती मध्यमा व वैखारीचे स्थान आहे,तसेच तीन बिंदू (पांढरा-मिश्र-लाल)(चंद्र-सूर्य-अग्नी) ह्यांचे स्थान व अणिमा व इतर,ब्राह्मी व इतर तसेच सर्वसंक्षोभीनि व इतर ह्या शक्तींचे स्थान आहे,तिन्ही बिंदूचा प्रकाश व तीनही वाणीचे कार्य ह्या त्रिकोणावरून भूरुपावर चालते (भूरूप हे त्रिकोणाच्या आत पण चक्रांच्या बाहेर तीन गोलाने दर्शवितात ज्यावर तीन बिंदूचा प्रकाश अर्थात चंद्र,सूर्य,अग्नीचा प्रभाव आहे)

क्रमणं पदविक्षेप: क्रमोदयस्तेन कथ्यते व्दिधा ।।

आवरणं गुरुपङि्क्तव्दयमिदम्बापदाम्बुजप्रसरम ।।३५।।

हालचाल (पसारा) जी  पदविक्षेप किंवा क्रमोदय आहे,त्याचे दोन प्रकार आहेत,शक्ती व गुरु (शक्ती व गुरुमंडल स्वरूपात त्याचा पसारा आहे-शक्ती ह्यात पायरी-पायरीने पाय पसरते) अर्थात ह्या अनंत पसाऱ्यात (आवरणे) तिचे मूळस्वरूप दिसत नाही खरेतर ते अनंत-अखंड तेजोमय आहे.

बिंदू व सदाशिव मिळून महेश्वरी शक्ती आहे जी निर्मिती-स्थिती-लय करण्यास समर्थ आहे,जी सर्व तत्वांच्या पलीकडे आहे,जी ज्योतिरूप आहे,जेथून अनंत किरणे निघतात ज्यानेच सर्व चराचर प्रकाशमान करते.जिच्या मुळेच निर्मिती होते,हीच चिद्रूपा होय.त्या अनंत किरणांपैकी सूर्य (दिवसा) (११६),चंद्र (१३६) (रात्र),अग्नी (१०८)(सकाळ-संध्याकाळ) मिळून ३६५ दिवस पिंड व ब्रह्मांड प्रकाशित करतात म्हणून ह्यांना कालत्रयात्मक असे म्हणतात.

सेयं परा महेशी चक्राकारेण परिणमेत यदा ।।

तद्द्येहावयवानां परिणतिरावरणदेवता: सर्वा: ।।३६।।

हिच्या अथांग पसाऱ्यात अनंत,अनेक शक्ती (बुडबुड्याप्रमाणे) उत्पन होतात व लय पावतात,तिच्या पसाऱ्यात (शक्तीचक्र) तिचे स्वरूप ज्योतिर्मयी जे अनंत प्रकाश आहे ते दिसत नाही जणू तिचा पसारा हे आवरण आहे.

असीना बिन्दुमये चक्रे सा त्रिपुरसुन्दरीदेवी ।।

कामेश्र्वराक्ङनिलया कलया चंद्रस्य कल्पितोत्तंसा ।।३७।।

पाशाक्ङशेक्षुचाप प्रसूनशरपञ्चकाञ्चितस्वकरा ।।

बालारुणारुणाग्ङी शशिभानुकृशानुलोचनत्रितया ।।३८।।

त्रिपुरसुंदरी बिंदूमय (पराकाश) चक्रात (सर्वआनंदमयचक्र) आहे,बिंदूत आत्मस्वरूपात ती संक्रमण करते (म्हणून ह्यास पीठ असे सुध्दा म्हणतात.) ती कामेश्र्वराच्या डाव्यामांडीजवळ आहे,तीला काल-स्थानाचे व व्याप्तीचे बंधन नाही,तिच्या कपाळावर कला आहे (विश्र्वजीवनी कला),ती सर्व तत्वांच्या पलीकडे आहे तिच्या हातात फांस(इच्छा)(स्व आणि स्वरूप ह्यातील भेद नाहीसा करणे),अंकुश(ज्ञान),साखरेचे धनुष्य व फुलांचा बाण आहे (क्रिया),तिचा वर्ण उगवत्या सूर्यासारखा लाल आहे,सूर्य,चंद व अग्नी तिचे डोळे आहेत. श्रीचक्र स्वरूपात ती प्रकट आहे.

तन्मिथुनं गुणभेदाद आस्ते बिन्दुत्रयात्मके त्र्यश्रे ।।

कामेश्र्वरिमित्रेश्र्वरि प्रमुखव्दन्व्दत्रयात्मना विततम् ।।३९।।

कामेश्वर व त्रिपुरसुंदरी (भेदभिन्न्त्वामुळे मिथुनरूप विहार करणारी हि जोडी) अर्थात प्रकाश-विमर्श हे त्रिकोणात आहेत,हा त्रिकोण तीन बिन्दुनी बनला आहे,गुणभेदामुळे हि जोडी तीन प्रकारच्या जोड्या दर्शविते यातील प्रथम जोडी मैत्रशांता-कामेश्र्वरी आहे. जसा गुरु-शिष्य हा भासात्मक भेद शिवस्वरुपात आहे तसाच येथे आहे,दुसरी जोडी उदशांता-बज्रेश्र्वरी,षष्ठीशांता-भागमालिनी ह्या तीन जोड्या (मिथुन)

आहेत,ज्या गुरुस्वरूपातील दिव्य,सिध्द,मानव (ओघा) स्वरूपातील मानल्या जातात. ह्या टोक खाली असलेल्या त्रिकोणाच्या खालच्या बिंदूवर त्रेतायुगातील गुरुस्थान,त्रिकोणावरील उजव्या बिंदूवर व्दापार युगातील गुरुपद,डाव्या बिंदूवर कलीयुगातील गुरुपद मानले जाते.

वसुकोणनिवासिन्यो यास्ता: संध्यारुणा वशिन्याद्या: ।।

पुर्यष्टकमेवेदं चक्रतनो: संविदात्मनो देव्या: ।।४०।।

आवरण देवता- आठ त्रिकोण असलेल्या चक्रात (सर्वरोगहारचक्र) वासिनी व इतर शक्ती आहेत,त्या संध्याकाळच्या सूर्यासारख्या लाल आहेत,हे देवीचे सूक्ष्म शरीर आहे,जेच चक्र आहे,येथे अत्युच्च (स्व:त्वाचा-आत्मज्ञान) अनुभव (पूर्णभावधान) आहे,हे श्रीचक्र असून ह्याच्या आठ बाजू - चेत,चित्त,चैतन्य,चेतना,इंद्रिय-कर्म,जीव,कला,शरीर आहेत.

तव्दिषयवृत्तयस्ता: सर्वज्ञादिस्वरूपमापन्ना: ।।

अन्तर्दशाशारनिलया लसान्ति शरदिन्दुसुन्दराकारा: ।।४१।।

आठ पाकळ्यांच्या चक्राच्या आत दहा पाकळ्यांचे चक्र आहे ज्यातील शक्ती आठ पाकळ्यांच्या चक्राच्या बरोबरीच्या आहेत,ह्या साधकास स्व आणि आत्म रक्षणासाठी प्रसिध्द आहेत,ह्या चंद्राच्या स्वच्छ प्रकाशासारख्या (शरदाचे चांदणे) पांढऱ्या आहेत,ह्यास निगरभागयोगिनी असे सुध्दा म्हणतात,हे चक्र (दहा पाकळ्यांचे) बिंदूच्या अगदि-जवळ असल्याने हे चक्र जाणणाऱ्यास आत्मज्ञान लवकर होते,ह्यास सर्वरक्षकरचक्र असे सुध्दा म्हणतात.

तब्दाह्यपङि्क्तकोणेषु योगिन्य: सर्वसिध्दिदा: पूर्वा: ।।

देवीधीकर्मेन्द्रिय विषयमय्यो विशदवेशभूषाढ्या: ।।४२।।

सर्वरक्षक चक्राबाहेर सर्वार्थसाधक (सर्व कामना पूर्ण करणारे) चक्र अगदीजवळच आहे,सर्व सिध्दी प्रदान करणाऱ्या दहा शक्ती ज्या (योगिनी) कुलकौला असे म्हणतात.ज्या ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये ह्यांचा विषय आहेत,(जसे आवाज ऐकण्याचा) त्यांची वस्त्रे व अलंकार पांढरे आहेत.त्या सिध्दी प्रदान करणाऱ्या आहेत.

भुवनारचक्रभवना देवीमनुकरणविवरणस्फुरणा: ।।

संध्यासवर्णावसना: संचिन्त्या: संप्रदाययोगिन्य: ।।४३।।

चौदा त्रिकोणांचे चक्र ज्यास सर्वसौभाग्यदायक असे म्हणतात,चौदा करणे (करण) ह्यात पाच ज्ञानेंद्रिये,पाच कर्मेंद्रिये व मानस,बुध्दी,अहंकार,चित्त येतात ह्यास विवर्ण स्फुरण असे सुध्दा म्हणतात,ह्या शक्ती प्रत्येक त्रिकोणात आहेत,ह्या आदिशक्तीचे स्वरूप असल्याने ह्यास संप्रदाय योगिनी असे सुध्दा म्हणतात.त्यांची वस्त्रे मावळत्या सूर्याप्रमाणे लाल आहेत.त्यांच्या अव्यक्त स्वरूपाचे ध्यान करावे.

अव्यक्तमहदहंकृति तन्मात्राभीष्टविकृताग्ङकारा: ।।

व्दिरदच्छदनसरोजे जयन्ति गुप्तरयोगिनीसंज्ञा ।।४४।।

आठ पाकळ्यांच्या कमळात अव्यक्ता (अव्यक्ततत्व),महत्ता(महत्तत्व),अहंक्रिती (अहंकार तत्व) व पांच तन्मात्रा(पंचभुतांच्या)ह्यांचे स्त्रीरूप आहे असे मानले जाते,ह्यांना गुप्ततर योगिनी (मूळदेवीच्या अंतरंगभूत असतात-एकरूप,अंगकुसुमा) असे म्हंटले जाते.इतर शक्ती ह्या चक्राच्या आठ पाकळ्यात आहेत.ह्यास सर्वसंक्षोभनचक्र असे म्हणतात.

भूतानीन्द्रियदशकं मनश्र्च देव्या विकारषोडशकम् ।।

कामाकर्षिण्यादि स्वरूपत: षोडशारमध्यास्ते ।।४५।।

सर्वभूत,ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये,मन (मानस),हे सोळा प्रकार (विकार) आहेत.कामकर्षिणीस्वरूप व इतर सोळा पाकळ्यांत आहेत. सर्वस्वपरिपुरक चक्रात (सर्व आशा पूर्ण करणाऱ्या) गुप्त योगिनी, कामकर्षिणीस्वरूप व इतर होत.हि व्यंजने आहेत जी स्वरात्मक आहेत.

मुद्रास्त्रिखण्ड्या सहसंविन्मय्य: समुच्छ्रिता: सर्वा: ।।

आदिमहीगृहवासा भासा बालार्ककान्तिभि: सदृशा: ।।४६।।

सर्व मुद्रा (त्रिखंड व सामावीत धरून) भू-रुपाच्या आहेत व त्यास तरुण सूर्याची प्रभा आहे,ह्या मुद्रा चिदघनानिष्ठ आहेत,(जडत्वाच्या) जे माही-ग्रह (भू-रूप) ह्याच्या आहेत.मुद्रा चिदव्योमकारिणी अर्थात (व्योम) आकाशात असतात,जसे खेचरी मुद्रा,मुद्रा भय व बंधनातून मुक्त करतात,ह्या मुद्रा मूलाधार ते बिंदूपर्यंतच्या नऊ चक्रांच्या स्वामिनी आहेत,चिदशक्ती जशी सृष्टी स्वरूप-धारण करते त्यानुसार ह्या मुद्रा आहेत (त्याप्रमाणेच न्यास) म्हणून ह्या अत्यंत परिणामकारक आहेत.

आधारनवकस्था नवचक्रत्वेन परिणति याता: ।।

नवनाथशक्तयोऽपि च मुद्राकारेण ताश्र्चक्रे ।।४७।।

नऊ आधार हेच चक्रांचे स्वरूप घेतात,म्हणून तशाच मुद्रा आहेत.नऊ आधार हे अकुल (मूलाधारा खालील हजार पाकळ्यांचे चक्र जे सहस्त्रदल चक्रासारखे पण लाल रंगाचे आहे असे समजले जाते),मूलाधार,स्वाधीस्थान,मणिपूर,विशुध्द,लाम्बिका,आज्ञा व बिंदू.

अस्यास्त्वगादिसप्तक माकारश्र्चैवमष्टकं स्पष्टम् ।।

ब्राह्म्यादिमातृरूपं मध्यमभूबिम्बमेतदध्यास्ते ।।४८।।

भू-पुराच्या (बिंब) मध्यभागी देवीचे सप्त धातु त्वचा इत्यादि आहेत,तसेच आठ मातृका (देवीमातेची रूपे) हि काम,क्रोध,लोभ,मोह,मद,मत्सर,पाप,पुण्य काहिंच्या मते उन्मेष सुध्दा आहे.

अणिमादिभूतयोऽस्या: स्वीकृतकमनीयकमिनीरूपा: ।।

विद्यान्तरगुणभावेन फलभूता भूनिकेतनगा: ।।४९।।

तिच्या आठ शक्ति अणिमा व इतर (अष्टमहासिध्दी) ह्या सुंदर स्त्री सारख्या आहेत (कमनीय कामिनी) अर्थात साधकास मोह पाडतात,ज्या इतर साधनेने (विद्येने) प्राप्त करता येतात,मोक्ष मार्गातील ह्या (अडथळा-साधकास मोह पाडणाऱ्या) लहान सिध्दि आहेत ज्या फार महत्वाच्या नाहित.

परमानन्दानुभव: परमगुरुनिर्विशेषबिन्व्दात्मा ।।

स पुन: क्रमेणाभिन्न: कामेशत्वं ययौ चिव्दिमर्शरुपम ।।५०।।

परमशिव परमात्मा बिंदूच्या बरोबर आहेत तेथे अत्यानंद आहे,विमर्श (शक्ती) स्वरूपात त्यांच्यात हळुहळु बदल होऊन कामेश स्वरूप प्राप्त होते.

चक्रक्रम मागे सांगितल्यावर आता गुरुक्रम सांगितला आहे,चक्र व मंत्र ह्याचे ज्ञान गुरु कडून होते प्रथम गुरु शिव होत.गुरूस अनुभव ज्ञान आहे (आत्मज्ञानांचा-परिपूर्णतेचा अनुभव) असल्याने तेथे निराशियानंद आहे,इतरांना आनंद कमी-जास्त प्रमाणात आहे.

आत्मस्वरूप गुरूजवळ बिंदु (कामकला) आहे,अर्थात आत्मस्वरूप गुरू (कामकला असणे हे विशेष नाही,फारतर त्याचे एक विशेषत्व असे म्हणावे लागेल) विशेष अर्थात ते अभिन्न आहे) तेच बिंदुरूप आहेत.जसे निराकारात आकार अर्थात आकाश , निराकार स्वरूप हे सर्वस्वरूप आहे.नित्य,अचिंत्य, शुध्द,ज्ञानरूप,विभ (सर्वव्यापी),निरंजन,अव्दय (व्दैतरहित),सच्चीदानंद व परमस्वरूप आहे जेच गुरूंचे अर्थात परमशिवांचे स्वरूप आहे.

कृपाळू परमात्माच प्रकाश व विमर्श (अनुघा -अर्धा भाग) स्वरूप आहे ज्याने स्वतःस अनेक बिंदु-कामकला कामेश्वर व कामेश्वरी स्वरूपात तसेच अनेक गुरुस्वरूपात (दिव्य,सिध्द,मानव) प्रकट केले आहे,शिवांचे आत्मरूपच शक्ती आहे जिचे स्वरूप समजते-दिसते व समजत-दिसत नाही (भाव-अभाव) दोन्ही त्यांचाच आहे.

आसीन: श्रीपीठे कृतयुगकाले गुरु: शिवो विद्याम् ।।

तस्यै ददौ स्वशक्तै कामेश्र्वर्यै विमर्शरुपिण्यै ।।५१।।

शिव जे गुरु आहेत ते उडीयानपिठात (श्रीपीठ-सर्वात आतील त्रिकोणाच्या आत) स्थित आहेत,त्यांनी कृतयुगात (सत्ययुग) शक्तीस हि वि**द्या (**आत्मरूपाचे -एकरूपतेचे रहस्य**)** सांगितली जी विमर्शशक्ती कामेश्वरी (स्वत्व सुध्दा सर्व प्रदान करणारी आहे.) (स्व)शक्तीमुळेच शिव प्रकट आहेत म्हणून दोन्हीत वेगळेपण नाही,जी मोक्ष-मुक्ती प्रदान करणारी आहे,अहं मध्ये अ (प्रकाश) शिव आणि ह (विमर्श) शक्ती आहे.

परमात्मा शिव जे सर्व प्रवर्तक आहेत,तेच गुरु आहेत ज्ञानोपदेश हा गुरुकडून घेतल्यास निश्चीत यश मिळते. कारण गु - अंधार,रु - दूर करणे अज्ञानरुपी अंधार दूर करण्यास गुरूच समर्थ आहेत.अर्थात स्व-स्वरूप ज्ञानाने समजते.

सापीशा मित्रेश मुख्यान्स्वांशात्र्जेष्ठमध्यमालाख्यान् ।।

चित्प्राणविषयरूपां स्त्रेतादियुगादिकारणत्रिगुरुन् ।।५२।।

बीजत्रितयाधिपतीन् परीक्ष्य विद्यां प्रकाशयामास ।।

एतैरोधत्रितयम् अनुग्रहीतुं गुरुक्रमो गदित: ।।५३।।

तीन जागांची (अमाकला त्रिकोणाचे तीनही बिंदू-टोके) ती साम्राज्ञी आहे तीला लहान (बालक),मधील (मध्यम),मोठी (जेष्ठ) अशी तीनही नावे आहेत,शिवांच्या मित्रदेव ह्या स्वरुपात ती प्रेयसी (त्याच्या लिलांचा विषय)(चितप्राणविषय)(हा विषय (चित्त) प्रणवाचा लय होईपर्यंत योगी अनुभवतात) आहे,ह्या शक्तीने प्रथम गुरूना हि विद्या सांगुन शुध्द केले.जी तीन युगांची बीजे आहेत,पहिले त्रेतायुग,तीन बिजांचे ते स्वामी आहेत.तीन गुरु व त्यांचे तीन प्रकारचे (परंपरा) समूह आहेत.

कामेश्वर व कामेश्वरी (अजरा - तरुण,अरुणा-लाल,विश्वयोनी -विश्वाचे कारण,विश्वजन्य - जगतमाता) समतत्व-समान आहेत,सत्ययुगात शिव जे उडयान पिठात (कामकला त्रिकोणाचा मध्य) आहेत येथे त्यांचे स्वरूप श्रीकार्यानंदस्वरूप आहे अर्थात स्व-स्वरूप आहे ह्यांनी त्या युगात कामेश्वरी जी सर्व

कारणस्वरूप आहे,तिच्या मार्फत (जी त्यांच्या बरोबरच आहे ) हे गुप्त ज्ञान (रहस्यतंत्र - श्रीविद्द्या) जे उपनिषदांचे सार आहे ते उघड केले.हेच नंतर पुढे त्रेता,व्दापार,कली युगात गुरूंच्या कडून सांगितले गेले ह्यास शंभवतंत्र असे सुध्दा म्हणतात.

श्रीविद्द्या समजण्याचे दोन मार्ग आहेत पहिला कामराज व दुसरा लोपामुद्रा,पहिला मार्गाचे विवरण सर्व प्रकारात आहे दुसऱ्या मार्गाचे विवरण वेगवेगळ्या खंडात आहे,दिव्य प्रकारात (पंथात) सात,सिध्द पंथाचे चार,मन्व पंथाचे आठ गुरु आहेत.

कृत (सत्ययुग) युगाच्या सुरवातीस श्रीकार्यानंदनाथ स्वरुपात परमशिव महात्रिपुरसुंदरी (विमर्शतनु) बरोबर आहेत,अर्थात स्व-शक्ती बरोबर आहेत.जे स्थान पहिल्या त्रिकोणाच्या (कामकला) मध्यावर आहे ज्यास नि:शब्द स्थान असे म्हणतात.त्या त्रिकोणाच्या (ज्याचे टोक खाली आहे) खालच्या टोकावर त्रेतायुगातील गुरु आहेत ज्यास कामरूप-पीठ असे सुध्दा म्हणतात,हे गुरु (ऊर्ध्वदेवनाथ) कामेश्र्वरी (कामेशी) देवतेबरोबर आहेत (जी त्या पिठाची देवता आहे),त्या पीठाचे वाग्भव बीज आहे असे म्हंटले जाते.उजव्या बाजूच्या टोकावर (जल्मधारापीठ) सस्थदेवनाथ वज्रेश्र्वरी बरोबर मिलित (एकरूप) स्वरुपात आहेत.येथे कामराज बीज आहे ,हे व्दापार युगातील गुरूंचे स्थान आहे,डाव्या बाजूच्या टोकावर पूर्णगिरीपीठ आहे येथे गुरु मित्रदेव आहेत जे कलीयुगाचे गुरु आहेत जे भागमालिनी (भागेशी) देवते बरोबर आहेत,तेथे शक्ती बीज आहे

सर्व गुरूंना अर्थात त्रेता,व्दापार,कली ह्यांना शुध्द करून ज्ञान देणारी असल्याने शक्तीस त्यांची गुरु (मित्रदेवतां) असे सुध्दा म्हणतात.

दिक्षा तीन प्रकारच्या आहेत अन्वी,शाक्त,शांभवी प्रत्येक प्रकारात त्याचे नियम व साधना क्रम आहेत सर्व प्रकार शिव-स्वरूपाशी तादात्म्य देणारे व सायुज्य-मुक्ती पर्यंत नेणारे आहेत.

उदित: पुण्यानंदा दिति कामकलाग्ङनाविलासोऽयम् ।।

परमशिवभुजग्ङपाशा कर्षितचित्ताय कल्पते नित्यम् ।।५४।।

चित्तान्तरग्ङचपल तृष्णासलिलाप्रपञ्चवाराशे: ।।

यदनुग्रहेण तीर्णस्तस्मै श्रीनाथनाविकाय नम: ।।५५।।

कामकला ह्या सुंदर स्त्रीच्या अर्थात विमर्श शक्तीच्या लीलात्मक खेळाचा जी कामेश्र्वर अर्थात परमशिव ह्यांपासून अभिन्न आहे त्याचा वृतांत पाहिला,ह्या लीला,चक्राच्या रूपाने प्रकट होतात,परमशिवाच्या प्रेमदृष्टीमुळे कामेश्र्वरी शक्तीच्या लीला मन व हृदयाला भिडतात कारण जणू

ह्यात श्रुंगार आहे,परमशिव हे शुध्द-प्रकाश आहेत पण त्यात इच्छा तयार करून अनेक भावांचे दर्शन होते,अश्या रीतीने पुण्यानंद ह्यांनी लिहिलेला हा ग्रंथ कामकला विलास समाप्त झाला.

|| समाप्त ||